शेतामध्ये किटकनाशक फवारणी करीत असताना होणाऱ्या विषबाधा, धार्मिक ठिकाणी/सार्वजनिक ठिकाणी होणाऱ्या चेंगराचेंगरीच्या घटना तसेच निवासी इमारती कोसळण्याच्या घटनांमध्ये बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांना मदत देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक :- सीएलएस-२०१९/प्र.क्र.१३२/म-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०४ नोव्हेंबर, २०१९

**वाचा** :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- आरएलएफ-११.०३/प्र.क्र.३१०/म-३, दि.२४.०८.२००४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- आरएलएफ-२०१४/प्र.क्र.३२९/म-३, दि.०५.०१.२०१६
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- सीएलएस-२०१८/प्र.क्र.९८/म-३, दि.१९.०७.२०१८
४) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा/कार्या-७(३)/प्र.क्र.११३/१८, दि.०९.०५.२०१९
५) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.निधीमा/२०१८/प्र.क्र.३४/तामे/२३(४), जा.क्र.१२५८३, दि.१८.०९.२०१९
६) जिल्हाधिकारी, गोंदिया यांचे पत्र क्र.जिकागों/अ.का./नैआ/कावि-३६/२०१९, दि.०८.०१.२०१९
७) जिल्हाधिकारी, अकोला यांचे पत्र क्र.कक्ष ६(४)/नै.आ./पॅकेज/कलि, दि.२०.०९.२०१९
८) जिल्हाधिकारी, अकोला यांचे पत्र क्र.कक्ष ६(४)/नैआ/पॅकेज/कलि/कावि-१८०, दि.२०.०९.२०१९

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दहशतवादग्रस्त व दंगलग्रस्त आपदग्रस्तांना मदत देऊन त्यांचे पुनर्वसन करण्याबाबतची योजना अंमलात आणण्यात आली आहे. या घटनांमध्ये बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांना द्यावयाच्या मदतीचे दर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सुधारित करण्यात आले असून यामध्ये नक्षलवादी कारवायांमध्ये बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांचा समावेश करण्यात आलेला आहे. या घटनांव्यतिरिक्त इतर अनेक मानव निर्मित आपत्तीच्या घटना घडतात जेथे अशा घटनांमधील आपदग्रस्तांना सहानुभूतीच्या दृष्टीकोनातून तातडीने मदत देणे आवश्यक असते. तथापि अशा प्रकरणी मदत देण्याबाबत शासनाचे कायमस्वरूपी धोरण नसल्यामुळे

अशा आपदग्रस्तांना तातडीने मदत देण्यामध्ये अडचणी निर्माण होतात. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी जनहित याचिका क्रमांक ११३/२०१७ मध्ये दिनांक २२.०२.२०१८ रोजी दिलेले आदेश विचारात घेऊन वर नमूद घटनेव्यतिरिक्त इतर मानव निर्मित घटनांमध्ये बाधित होणाऱ्या व्यक्तींना मदत देण्यासाठी स्वतंत्र योजना संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये अंमलात आणण्यात आली आहे.

त्यानुसार विभागीय आयुक्त, नाशिक, नागपूर तसेच जिल्हाधिकारी गोंदिया, अकोला, नागपूर यांनी शेतामध्ये किटकनाशक फवारणी करीत असताना होणाऱ्या विषबाधेमध्ये मृत झालेल्या व्यक्तींना मदत करण्याबाबतचे संदर्भाधीन क्र.४ ते ७ च्या पत्रान्वये सादर केलेले प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होते. याप्रकरणी सर्व बाबी विचारात घेऊन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

शेतामध्ये किटकनाशकाची फवारणी करीत असताना झालेल्या विषबाधेमध्ये मृत झालेल्या खालील तक्त्यात नमूद व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी रू.४.०० लक्ष (रूपये चार लक्ष फक्त) या प्रमाणे रू.३६,००,०००/- (रूपये छत्तीस लक्ष फक्त) एवढी मदत अदा करण्यास याव्दारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | **विभागीय आयुक्त** | **जिल्हा** | **मृत व्यक्तीचे नाव** | **वितरीत करावयाची रक्कम (रु.लाखात)** |
|---|---|---|---|---|
| १. | विभागीय आयुक्त, नाशिक | जिल्हाधिकारी, जळगाव | १) श्री.चंद्रकांत गि. महाजन<br>२) श्री.वाल्मिक भि. पाटील<br>३) श्री.रघुनाथ चं. पाटील | १२.०० |
| २. | विभागीय आयुक्त, अमरावती | जिल्हाधिकारी, अकोला | १) श्री.विजय गो. सरदार<br>२) श्री.हिम्मत ह. करवते | ८.०० |
| ३. | विभागीय आयुक्त, नागपूर | जिल्हाधिकारी, नागपूर | श्री.कैलास भा. मेंघरे | ४.०० |
| | | जिल्हाधिकारी, चंद्रपूर | १)श्री.खुशाल ल. देशमुख<br>२)श्री.मंगेश दे. निकुरे | ८.०० |
| | | जिल्हाधिकारी, गोंदिया | श्री.भारत दौ. खजारिया | ४.०० |

२. वरील मृत व्यक्तिंच्या वारसदारांना अदा करावयाची रक्कम संबंधित विभागीय आयुक्तांमार्फत उपलब्ध करून देण्यात येत आहे. कक्ष अधिकारी म-११ यांनी सदर निधी अर्थसंकल्पित वितरण प्रणालीवर वितरीत करावा.

३. याबाबतचा खर्च, "मागणी क्र.सी-५, प्रधान लेखाशीर्ष-२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाज कल्याण, १०४, वृध्द, विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण, (००)७०१८ अपघातग्रस्तांना आर्थिक मदत (अनिवार्य) (२२३५ ०३११) ३१, सहाय्यक अनुदाने" या मुख्य लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर प्रकरणी खर्चाचे पत्रक विहित कालमर्यादेत न चुकता महसूल व वन विभागास प्राप्त होईल याची संबंधित विभागीय आयुक्त तसेच जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच प्रचलित नियमानुसार मदतीचे वाटप करण्यात यावे.

५. नियंत्रक अधिकारी यांना असेही कळविण्यात येते की, सदर मदतीची रक्कम विनाविलंब वितरीत करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही यांची दक्षता घ्यावी. अनुदान वाटपासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ पाठविण्यात यावे. याबाबतचा खर्चाचा मेळ महालेखापाल यांनी नोंदविलेल्या खर्चाशी घेण्यात यावा व महालेखापालाच्या ताळमेळ प्रमाणपत्रासह विनियोजन लेखे शासनाकडे तात्काळ पाठवावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१९११०४१५१७५८५४१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2019.11.04 15:21:17 +05'30'

**(सु. ह. उमराणीकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त नाशिक/अमरावती/ नागपूर
२)जिल्हाधिकारी, जळगाव/अकोला/नागपूर/गोंदिया/चंद्रपूर
३) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
६) संचालक लेखा व कोषागरे, संगणक शाखा, मुंबई,
७) कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प-१/म-११/पीएसी/पीएसी-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा जळगाव/अकोला/नागपूर/गोंदिया/चंद्रपूर
९) निवडनस्ती (म-३ कार्यासन)